**आदिवासी विकास विभागातील बांधकाम व्यवस्थापन कक्षांतर्गत आदिवासी उपयोजना क्षेत्रातील (TSP) तसेच आदिवासी उपयोजना बाहय क्षेत्रातील (OTSP) शासकीय आश्रमशाळा/ वसतीगृह इमारतींची देखभाल व दुरुस्ती योजनांच्या कामांच्या वर्गीकरणाबाबत.**

# महाराष्ट्र शासन

## आदिवासी विकास विभाग

**शासन निर्णय क्रमांक शाआबां-२०२४/प्र.क्र.१५४/का.१३**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : ०५ ऑगस्ट २०२४

**वाचा -:**

१) आदिवासी विकास विभाग, शासन निर्णय क्रमांक: शाआबां-२०२४/प्र.क्र.२१०/बांव्यक, दि.२७.०२.२०२४
२) आदिवासी विकास विभाग, शासन निर्णय क्रमांक: शाआशा-२०१५/प्र.क्र.१८२/का.१३, दि.२९.०७.२०१५
३) आदिवासी विकास विभाग, शासन निर्णय क्रमांक: शाआशा-२०१५/प्र.क्र.१८२/का.१३, दि.०४.०५.२०१८

**प्रस्तावना :-**

आदिवासी विकास विभागाच्या संदर्भाधीन दि.२७.०२.२०२४ रोजीच्या शासन निर्णयान्वये आदिवासी उपयोजना क्षेत्रातील (TSP) तसेच आदिवासी उपयोजना बाहय क्षेत्रातील (OTSP) शासकीय आश्रमशाळा/ वसतीगृह इमारतींची देखभाल व दुरुस्ती योजना राबविण्याची कार्यप्रणाली निश्चित करण्यात आली आहे. सद्यस्थितीत शाळेच्या दुरुस्त्या शाळा व्यवस्थापन समितीमार्फत राबविल्या जात आहेत. सदर क्षेत्रीय स्तरावर कामे करत असताना क्षेत्रिय यंत्रणांमध्ये कामाच्या वर्गीकरणाबाबत संभ्रम निर्माण होवू नये व देखभाल दुरुस्त्यांच्या कामाची चालढकल व टाळाटाळ होवु नये म्हणून प्रकल्प अधिकारी/ कार्यकारी अभियंता, सा.बां. (आदिवासी) विभाग / शाळा व्यवस्थापन समिती/ शासकीय आश्रमशाळेचे मुख्याध्यापक/ वसतीगृहांचे गृहपाल या संस्थांनी कोणत्या प्रकारची कामे करावीत याविषयी मार्गदर्शनपर सूचना निर्गमित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय -:**

आदिवासी विकास विभागातील बांधकाम व्यवस्थापन कक्षांतर्गत आदिवासी उपयोजना क्षेत्रातील (TSP) तसेच आदिवासी उपयोजना बाहय क्षेत्रातील (OTSP) शासकीय आश्रमशाळा/ वसतीगृह इमारतींची देखभाल व दुरुस्तीच्या कामांचे प्रकल्प अधिकारी/ कार्यकारी अभियंता, सा.बां. (आदिवासी) विभाग / शाळा व्यवस्थापन समिती/ शासकीय आश्रमशाळेचे मुख्याध्यापक/ वसतीगृहांचे गृहपाल यांना खालील प्रमाणे कामांचे वर्गीकरण करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

अ) प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास विभाग

१) वार्षिक देखभाल दुरुस्तीचे वार्षिक करारनामे पुढीलप्रमाणे करणे.

i. आर. ओ. जलशुध्दीकरण यंत्रे दुरुस्ती
ii. शौचालय व स्नानगृहांची दैनंदिन साफसफाई करणे.
iii. आश्रमशाळा व वसतीगृह इमारतीत दैनंदिन केरकचरा काढणे.
iv. सोलार पॅनेल दुरुस्ती.
v. गिझर दुरुस्ती.
vi. जनरेटर सेट दुरुस्ती इ.

आ) शाळा व्यवस्थापन समिती :-

१. एकावेळी कमाल रु. ५० हजार पर्यंतच्या मर्यादेत कामे करण्याबाबत

i. तुटलेले जुने दरवाजे दुरुस्ती करणे अथवा काढुन नविन दरवाजे बसविणे. (७-८ मर्यादीत)
ii. कडीकोयंडे दुरुस्ती करणे किंवा नविन बसविणे.
iii. नळांची दुरुस्ती करणे किंवा नविन बसविणे.
iv. मग, बादल्या, झाडु इ. पुरवठा करणे.
v. Syntex पाण्याची टाकी साफसफाई करणे.
vi. Handwash Basin बसविणे व नियमित स्वच्छ करणे.
vii. शौचालयाचे ३-४ भांडे बसविणे. (किरकोळ संख्या)
viii. छतावरील जुने तुटलेले पत्रे काढुन नवीन पत्रे बसविणे.
ix. भागाभागातील तुटलेली/ खचलेली फरशी काढुन त्यावर PCC करणे किंवा नवीन फरशी बसविणे.
x. पाण्याच्या टाकीपासुन नळापर्यंतचे काही खराब पाईप काढुन नवीन बसविणे.
xi. एक ते दोन चेंबर्सची दुरुस्ती करणे.
xii. किचन ओट्याची दुरुस्ती करणे.
xiii. दरवाजे, खिडक्यांना रंगकाम करणे.
xiv. संकुल परिसर व खेळाचे मैदान स्वच्छता साफसफाई करणे.
xv. तुंबलेले चेंबर सफाई करणे.
xvi. नादुरुस्त बल्ब व टयुब, फळे, SWITCH BOARD इ. बदलणे.

इ) कार्यकारी अभियंता, सा.बां. (आदिवासी) विभागाकडून इमारतीचे आयुष्यमान, वापरण्यास योग्य व सुरक्षित करावयाची कामे

१) जुने पत्र्याच्या व आर. सी. सी. इमारतींची दुरुस्तीची कामे करणे.

i. पुर्णपणे जुने पत्रे काढुन नविन पत्रे बसविणे.
ii. Truss ची दुरुस्ती करणे.
iii. भींतींना आतुन व बाहेरुन प्लास्टर व इमारतीचे रंगकाम करणे.
iv. नविन दरवाजे, खिडक्या व ग्रील बसविणे.
v. Turbo ventilator बसविणे.

vi. नविन फरशी बसविणे.

vii. जोता पातळी संरक्षण बांधकाम करणे.

viii. Syntex पाण्याच्या नवीन टाक्या बसविणे, नविन पाईप लाईन व नळ बसविणे, गटर्सच्या दुरस्त्या करणे.

ix. न्हाणीघर, शौचालय, शौचालयाचे भांडे, Septic Tank, Chambers यांची विशेष दुरुस्ती करणे.

x. जलरोधक प्रतिबंध कार्यवाही करणे.

xi. PCC Paver block बसविणे.

xii. जिन्याला ग्रील बसविणे.

xiii. इमारतीवरील व जमिनीखाली पाण्याच्या टाक्या बसविणे.

xiv. BOREWELL & HANDPUMP बसविणे.

xv. नविन खेळाचे मैदान बनविणे अथवा दुरुस्ती करणे.

२) विद्युत पुरवठा विषयक कामे करणे.

i. DP / TRANSFORMER, LINE SHIFTING आवारात NIGHT LAMP बसविणे.

ii. SWITCH BOARD, REWIRING चे नविन काम करणे.

ई) शासकीय आश्रमशाळेचे मुख्याध्यापक/ वसतीगृहांचे गृहपाल यांनी करावयाची कामे.

i. उपरोक्त दुरुस्तीच्या कामांच्या यादी व्यतिरिक्त नियमित कामकाजात अडथळा निर्माण होवू नये यासाठी तातडीने दुरुस्ती आवश्यक असणारी किरकोळ कामे.

२. याशिवाय न विभागालेले काम, यादीत नसलेली नविन, तातडीने उद्भवणारी कामे राबविणारी यंत्रणा अपर आयुक्त, आदिवासी विकास यांनी निश्चित करावी.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२४०८०५१५४४४२१५२४ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने .

VIJESING
FATTESING VASAVE

Digitally signed by VIJESING FATTESING VASAVE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TRIBAL DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=5494d2ad3a3bc5ddd66daf9a8f17ceec5e2d7d4b6a8bba99c51d275801bcdf1b, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=2182F4F20DAA6841AB430B2FD812E7B5D3A883E72EFA574CA5E29FF528BC8015, cn=VIJESING FATTESING VASAVE
Date: 2024.08.05 15:59:04 +05'30'

**( वि. फ. वसावे )**
**सहसचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत -:**

१) मा.राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मुंबई

२) मा.सभापती/ उपसभापती, महाराष्ट्र विधान परिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई

३) मा.अध्यक्ष/ उपाध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई

४) मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई

५) मा.उपमुख्यमंत्री (गृह) यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई

६) मा.उपउपमुख्यमंत्री (वित्त व नियोजन) यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई

७) सर्व मंत्री/ राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई

८) मा.विरोधी पक्षनेता, विधानपरिषद/ विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
९) सर्व मा.विधानपरिषद/ विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
१०) मुख्य सचिव यांचे सहसचिव, मंत्रालय, मुंबई
११) अपर मुख्य सचिव/ प्रधान सचिव/ सचिव, सर्व मंत्रालयीन विभाग, मंत्रालय, मुंबई
१२) अपर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
१३) महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१/२, मुंबई, नागपूर
१४) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१/२, मुंबई, नागपूर
१५) आयुक्त, आदिवासी विकास आयुक्तालय, नाशिक
१६) सर्व जिल्हाधिकारी
१७) मुख्य अभियंता, बांधकाम व्यवस्थापन कक्ष, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
१८) अपर आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक/ ठाणे/ अमरावती/ नागपूर
१९) सर्व नियंत्रक अधिकारी, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
२०) प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प (सर्व)
२१) अधीक्षक अभियंता, सा.बां. (आदिवासी) मंडळ, नाशिक/ नागपूर
२२) कार्यकारी अभियंता, सा.बां. (आदिवासी) विभाग, ठाणे/नाशिक/अमरावती/ चंद्रपूर
२३) निवड नस्ती.